**जलसंपदा विभागातील कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांच्या दिनांक १५.११.१९७६ ते दिनांक ३१.०३.१९८१ या <u>कालावधीच्या ज्येष्ठतासूचीत सुधारणा करण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन,**
**जलसंपदा विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक : ज्येष्ठता ११११/(३५१/२०११)/आ.(तांत्रिक),**
**मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२ .**
**दिनांक :- ०२/१२/२०११.**

पहा :- शासन परिपत्रक क्रमांक : ज्येष्ठता १२१०/(३८०/२०१०)/आ(तांत्रिक), दिनांक ३०.१२.२०१०.

**<u>परिपत्रक:-</u>**

जलसंपदा विभागातील कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) पदावर दिनांक १५.११.१९७६ ते दिनांक ३१.०३.१९८१ या कालावधीत नियुक्ती दिलेल्या कनिष्ठ अभियंत्यांची अंतिम ज्येष्ठतासूची शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्रमांक ज्येष्ठता ११०३/(२४४/२००३)/आ.(तांत्रिक), दिनांक २१.०२.२००७ अन्वये प्रसिध्द करण्यात आली होती. सदर यादीत दि. ३०.१२.१० पर्यंत करण्यात आलेल्या सर्व सुधारणांसह ती यादी अद्ययावत करून शासनाच्या संदर्भिय परीपत्रकान्वये पुनःप्रकाशित करण्यात आली आहे व ती शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आली आहे. सदर ज्येष्ठतासूचीमध्ये काही त्रुटी निदर्शनास आल्याने त्या अनुषंगाने संबंधित मुख्य अभियंता / अधीक्षक अभियंता यांच्याकडून प्राप्त अहवालानुसार त्याबाबतची खातरजमा करून ज्येष्ठता सूचीतील संबंधित नोंदींमध्ये आवश्यक त्या सुधारणा सोबतच्या परिशिष्टात दर्शविल्यानुसार करण्यात येत आहेत.

सदर परिशिष्टात नमूद केलेल्या सुधारित नोंदीबाबत संबंधितांना कळविण्याची जबाबदारी संबंधित मंडळ कार्यालयाची राहील, याची नोंद घ्यावी.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१११२०२०६२७२४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( द. अ. शिंदे )**
**शासनाचे अवर सचिव**

प्रत :-

सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
सर्व अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्था.स्तर) मंडळ.

प्रत :- आ.(शा.अ.)/आ.(ज्येष्ठता)/आ.(वर्ग २) कार्यासने , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रत :- आ.(तांत्रिक ) संग्रहार्थ .

शासन परिपत्रक क्र. ज्येष्ठता-११११/( ३५१/२०११), दि.०२/१२/२०११चे परिशिष्ट

| अ. क्र. | ज्येष्ठता सूची क्रमांक व कर्मचा-याचे नांव | कार्यालयाचे नाव | केलेली सुधारणा |
|---|---|---|---|
| १ | ६८७३<br>बुरडकर पी. पी | गोसीखुर्द प्रकल्प जलसंपदा विभाग, नागपूर | शैक्षणिक अर्हतेत डी. सी. ई. ऐवजी डी. सी. आर. ई अशी नोंद घेण्यात आली. |
| २ | ६३४६<br>झाडे एस. एन. | जलसंपदा विभाग, औरंगाबाद | नावात झाडे एस. एन. ऐवजी झाडे एस. एम. अशी सुधारणा केली. |
| ३ | ५८२९<br>६७७८<br>वर्मा डी. आर. | लाक्षेविप्रा, नागपूर | श्री. वर्मा यांची नियुक्ती ३/९/१९७७ रोजी झाली असल्याने दि ४/३/१९७९ या दिनांकावर निश्चित केलेली अनुक्रमांक ५८२९ व दि ४/३/१९८० या दिनांकावर निश्चित केलेली अनुक्रमांक ६७७८येथील ज्येष्ठता रद्द करण्यात आली. नवीन ज्येष्ठता क्र. ५१८४-अ-१ येथे निश्चित करण्यात आली. |
| ४ | ५३४८-अ<br>संतासे दिलीप विश्वनाथ | लपा(स्था स्तर), पुणे | श्री संतासे यांच्या जन्मतारखेत दि. २/३/१९६१ ऐवजी दि. २/३/१९५६ असा बदल करण्यात आला तसेच श्री संतासे यांची नियुक्ती दि.५/१२/१९८० रोजी झाली असल्याने दि.३१/३/७८ हया दिनांकावर निश्चित केलेली ५३४८-अ येथील ज्येष्ठता रद्द करण्यात आली नवीन ज्येष्ठता क्र. ७२२०-अ-१ येथे निश्चित करण्यात आली |

---------------